महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिमअंतर्गत तंटामुक्त गावास पुरस्कार देण्यासाठी कमी पडणारा रु.१९,०३,२५,०००/- इतका निधी मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र.तंमुगा १००९/प्र.क्र.४९/२००९/पोल-१५,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: १५ जानेवारी, २०१०.

वाचा:- १) शासन निर्णय गृह विभाग क्र.तंमुगा१००९/सीआर-४९/२००९/पोल-१५, दिनांक ९ ऑगस्ट, २००९.

२) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्रमांक -पोमसं/७०/मंगातंमुगा /३४/९०६९/०९, दिनांक १४/१२/२००९.

३) अवर सचिव, गृह विभाग, बीयुडी-१ यांचे पत्रक्रमांक- बीजीटी-१००९/ प्र.क्र.२४६/बीयुडी-१, दिनांक- २/१/२०१०.

शासन निर्णय :- उपरोक्त संदर्भीत (१) येथीलशासन निर्णयान्वये महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिमअंतर्गत सन २००८-२००९ या वर्षात २८२१ गावे पुरस्कारासाठी घोषित करण्यात आलेली आहेत. सदर गावांना पुरस्कार प्रदान करण्यात करण्याकरीता एकूण रु. ६८,७८,२५,०००/- (रुपये अडुसष्ट कोटी अठ्ठयाहत्तर लाख पंचवीस हजार फक्त) इतक्या निधीची आवश्यकता आहे. तथापि, या प्रयोजनासाठी रुपये ४८,७५,००,०००/- (रुपये अठ्ठेचाळीस कोटी पंचाहत्तर लाख फक्त) एवढी मूळ तरतुद उपलब्ध आहे. यास्तव याप्रयोजनासाठी कमी पडणारा रु. १९,०३,२५,०००/- (रुपये एकोणीस कोटी तीन लाख पंचवीस हजार फक्त) इतका निधी पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च गृह विभाग मागणी क्रमांक : बी - १ , प्रधान लेखाशीर्ष - २०५५ पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस (००)(१०) तंटामुक्त गाव मोहिम (२०५५ ०५ ३३) ३१ सहायक अनुदाने (दत्तमत) याशीर्षाखालील तरतूदीतून तसेच सन २००९ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणी बाब क्र-२२ अन्वये मंजूर झालेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. राज्यातील तंटामुक्त गाव पुरस्कारासाठी पात्र ठरणारी २८२१ गावे आणि त्यातील शांतता पुरस्कारासाठी पात्र २६३ गावे तंटामुक्त गाव म्हणून घोषित करण्यात आली असून गावांची जिल्हानिहाय यादी शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ येथे

देण्यात आली आहे. सन २००१ च्या जनगणनेप्रमाणे या गावांच्या लोकसंख्येनुसार त्यांना मिळालेल्या पुरस्काराची रक्कम गावाच्या नावासमोर दर्शविण्यात आली आहे.

४. प्रत्येक जिल्ह्यातील पुरस्कार प्राप्त गावांना अनुज्ञेय ठरणाऱ्या पुरस्काराच्या रकमेइतक्या तरतूदीचे जिल्हानिहाय वितरण पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे करतील.

५. जिल्हा पोलीस अधीक्षक हे संबंधित जिल्ह्यातील पुरस्कार प्राप्त गावांच्या पुरस्काराच्या रकमेचे धनादेश तयार करतील आणि गावनिहाय त्याचे वितरण करतील.

६. सदर प्रयोजनार्थ काढावयाची देयके ही महाराष्ट्र कोशागार नियम नमुना क्रमांक ४९ मध्ये सादर करुन त्यासाठी लागणारी रक्कम आहरीत करावी.

७. सदरचे आदेश संदर्भ क्रमांक (३) येथील कार्यासन बीयुडी-१ च्या दिनांक २/१/२०१० च्या पत्राच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मा।आ।गुट्टे

( मा. आ. गुट्टे )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
महालेखापाल-१ (ले व अ/लेखापरिक्षा) महाराष्ट्र,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व परिक्षेत्राचे विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व पोलीस अधीक्षक,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा, अधिकारी,मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग (व्यय-७/ अर्थ-१०) मंत्रालय,मुंबई,
निवडनस्ती, पोल-१५.